पुणे जिल्ह्यातील १२ तलाठयांच्या अनियमित सेवा नियमित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२५२/ई-१०**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ३१ मे, २०१७

**प्रस्तावना :-**

महसूल विभागाच्या शासन निर्णय क्रमांक आरईएन-१०८१/१७१०(७४१)/एम-१०, दिनांक २२/०४/१९८१ अन्वये पुणे महसूल विभागात ४०० तलाठयांची नवीन पदे निर्माण करण्यात आली होती. यावेळी निर्माण करण्यात आलेल्या पदांवर नियुक्ती करण्यासाठी सेवायोजन कार्यालयामार्फत उमेदवारांची यादी प्राप्त करुन त्यांची निवड समितीमार्फत मुलाखत घेवून सदर पदे भरणे आवश्यक होते. तथापि पुणे जिल्हयातील तत्कालीन उपविभागीय अधिकारी, बारामती यांनी निवड समितीमार्फत मुलाखती न घेता परस्पर अर्जाद्वारे एकूण १७ उमेदवारांची नियुक्ती तलाठी पदावर सन १९८३ ते १९८५ या काळात केली. पुणे जिल्ह्यातील सदर १७ तलाठयांपैकी श्री.व्ही.डी.कुलकर्णी व इतर ११ अशा एकूण १२ तलाठी कर्मचाऱ्यांनी त्यांच्या अनियमित सेवा नियमित करण्याबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज क्रमांक २४२/२०१५ दाखल केला होता. सदर मुळ अर्जाच्या संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक १८/०७/२०१६ रोजी अर्जदारांच्या बाजूने निर्णय दिला. सदर मा.न्यायाधिकरणाच्या निर्णयाच्या विरोधात शासनाकडून मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.१४१९९/२०१६ दाखल करण्यात आली असता, मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०६/०१/२०१७ रोजीच्या आदेशान्वये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे दिनांक १८/०७/२०१६ रोजीचे आदेश कायम ठेवून सदर रिट याचिका फेटाळली. त्यामुळे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणामध्ये मूळ अर्ज दाखल केलेल्या सदर १२ तलाठयांच्या उपविभागीय अधिकारी, बारामती यांनी केलेल्या अनियमित नेमणूका नियमित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे श्री. व्ही.डी.कुलकर्णी व इतर ११ यांनी त्यांच्या तलाठी पदावरील अनियमित सेवा नियमित करण्याबाबत दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक २४२/२०१५ संदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेले दि.१८/०७/२०१६ रोजीचे आदेश व त्याअनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र. १४१९९/२०१६ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०६/०१/२०१७ रोजी दिलेले आदेश विचारात घेवून पुणे जिल्हयातील बारामती उपविभागामधील खालील नमूद अनु.क्र. १ ते १२ येथील तलाठ्यांच्या अनियमित नेमणुका पुढीलप्रमाणे नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**अ.क्र. तलाठी कर्मचाऱ्यांचे नांव**

१) श्री. विनायक दिगंबर कुलकर्णी

२) श्री. लक्ष्मण यादवराव साळुंखे

३) श्री. राजकुमार शिवराम पवार

४) श्री. माणिक शिवाजी मोरे
५) श्री. संपत श्रीरंग गायकवाड
६) श्री.शिवाजी बाबुराव जगताप
७) श्री. सदाशिव सर्जेराव काळे
८) श्री.भारत नारायण पळसे
९) श्री.कुंडलिक लक्ष्मण जाधव
१०) श्री.तुकाराम नेमचंद चवरे
११) श्री.लक्ष्मण हरी बंडगर
१२) श्री.शेख इकबाल अब्दुल अजीज

(i) पुणे जिल्हयातील तलाठी संवर्गाच्या अनियमित सेवा नियमित करणेबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.२४२/२०१५ मध्ये दाखल केलेल्या अर्जदार तलाठी कर्मचारी यांच्या सेवा त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित करण्यात याव्यात.

(ii) उक्त १२ तलाठी कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित झाल्यानंतर त्यांची सेवा, थकबाकी व्यतिरिक्त सर्व प्रयोजनार्थ, विचारात घेण्यात यावी.

(iii) जे अर्जदार शासन सेवेतून निवृत्त झाले त्यांना निवृत्ती वेतन विषयक लाभ मिळण्याचा हक्क पोहोचतो, त्याअनुषंगाने त्यांना असे लाभ यापूर्वी दिले नसतील तर ते देण्यात यावेत.

(iv) अनुक्रमांक ११ वरील दिवंगत लक्ष्मण हरी बंडगर यांचे शासन सेवेत तलाठी म्हणून कार्यरत असतांना निधन झाल्याने त्यांच्या विधवा पत्नी श्रीमती अंजना लक्ष्मण बंडगर यांना कुटूंब निवृत्ती वेतन मंजूर करण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. १२१/१७/सेवा-३, दि.०७/०३/२०१७ व अनौ.सं.क्र.७५/२०१७/व्यय-९ दि. २४/०३/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११७१८२६६११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.05.31 17:22:45 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**
उप सचिव

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त,पुणे.
२. जिल्हाधिकारी, पुणे.

३. महालेखापाल-१,(लेखा परीक्षा) व (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. उपविभागीय अधिकारी, बारामती, जिल्हा पुणे.
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १२), मंत्रालय, मुंबई-३२.
७. उप सचिव, वित्त विभाग ( कार्यासन क्र. सेवा-३/व्यय-९), मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती, ई-१०, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.